**संगीत संयुक्त मानापमान या नाट्य प्रयोगास १०१ वर्ष पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर विशेष कार्यक्रमाच्या आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२२ /प्र.क्र. ५०८/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-** १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण ८२२२/प्र.क्र.१९५/सां.का.४, दिनांक २० डिसेंबर, २०२२.
२.सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ २५५६, दिनांक २६ एप्रिल, २०२३.
३. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ३४३०, दिनांक १४ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

संगीत नाट्य रंगभूमीवर त्यावेळेस वेगवेगळे प्रयोग केले जात होते. त्या काळात गाजत असलेले "संगीत संयुक्त मानापमान" नाटक संगीत सुर्य केशवराव भोसले आणि बालगंधर्व यांनी एकत्रितपणे सादर केले.

या नाट्यप्रयोगाचे औचित्य साधून केशवराव भोसले व बालगंधर्व यांच्या स्मृतीला उजाळा मिळावा तसेच “संगीत संयुक्त मानापमान” नाट्य प्रयोगाला १०१ वर्षे पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर दिनांक ७ जुलै, २०२३ रोजी रवींद्र नाट्य मंदिर, प्रभादेवी,मुंबई येथे सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. उपर्निर्दिष्ट १ च्या शासन निर्णयान्वये सदर कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तरी, सदर कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक ७ जुलै, २०२३ रोजी रवींद्र नाट्य मंदिर, प्रभादेवी, मुंबई येथे आयोजित करण्यात आलेल्या "संगीत संयुक्त मानापमान" या नाट्यप्रयोगास १०१ वर्षे पूर्ण झाल्याच्या औचित्यावर आयोजित करण्यात आलेल्या सांस्कृतिक कार्यक्रमावरील खर्च रुपये २०.०० लक्ष (रुपये वीस लक्ष फक्त ) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०११६१३३७३७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.08.02 14:37:17 +05'30'

**( अनिरुध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४